राज्यात पवन ऊर्जा प्रकल्प विकसित करण्यासाठी केंद्र शासनाच्या मायक्रोसायटींग विषयक मार्गदर्शक सूचना लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पवन-२०२३/प्र.क्र.२८६/ ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २५ ऑगस्ट, २०२३

वाचा :-

१. मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील जनहित याचिका क्र.१२९/२०१३ मध्ये दिनांक ०९.०७.२०१४ रोजीचे मा.न्यायालयाचे अंतरिम आदेश.
२. केंद्र शासनाच्या पवन ऊर्जा प्रकल्प उभारणीबाबतच्या मार्गदर्शक सूचना, दिनांक २२.१०.२०१६.
३. महाऊर्जा कार्यालयाचे पत्र क्र. पीजीएन-१/पवन ऊर्जा धोरण/२०१८-१९/३८२७, दिनांक १३.०८.२०१८.
४. महाऊर्जा कार्यालयाचे पत्र क्र. पीजीएन-१/ पवन ऊर्जा धोरण/२०२०-२१/४३८, दिनांक ०५.०२.२०२१.

प्रस्तावना :-

पवन ऊर्जा प्रकल्पांसंदर्भात महाऊर्जा कार्यालयाने दिनांक २९.१२.२००७ रोजी मायक्रोसायटींग विषयक मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या होत्या. तद्नंतर, सदर मायक्रोसायटींग मार्गदर्शक सूचनांमध्ये दिनांक १६.०२.२००८ व दिनांक १२.०३.२०१३ रोजी सुधारणा करण्यात आली. मायक्रोसायटींग विषयक मार्गदर्शक सूचनांमध्ये दिनांक १२.०३.२०१३ रोजी केलेल्या दुसऱ्या सुधारणेविरोधात मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र.१२९/२०१३ दाखल आहे. सदर प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक ०९.०७.२०१४ रोजीच्या अंतरिम आदेशाद्वारे महाऊर्जा कार्यालयाने दिनांक १२.०३.२०१३ रोजी निर्गमित केलेल्या मायक्रोसायटिंग विषयक मार्गदर्शक सूचनांच्या दुरुस्तीच्या अंमलबजावणीस स्थगिती दिली आहे. केंद्र शासनाने दिनांक २२.१०.२०१६ रोजी पवन ऊर्जा प्रकल्पांसंदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. या सूचनांपैकी मुद्दा क्र. ५ मायक्रोसायटींग विषयक मार्गदर्शक सूचनांशी संबंधित आहे. जनहित याचिका क्र. १२९/२०१३ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०९.०७.२०१४ रोजी दिलेले अंतरिम आदेश विचारात घेऊन महाऊर्जा कार्यालयाने संदर्भाधिन क्र.३ व ४ येथील पत्रान्वये केंद्र शासनाच्या दिनांक २२.१०.२०१६ रोजीच्या मायक्रोसायटींग विषयक मार्गदर्शक सूचना राज्यातील पवन ऊर्जा प्रकल्पांना लागू करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. केंद्र शासनाच्या दिनांक २२.१०.२०१६ रोजीच्या मायक्रोसायटींग विषयक मार्गदर्शक सूचना सर्वसमावेशक असून पवन ऊर्जा प्रकल्पांच्या विकासासाठी पोषक/लवचिक असल्याने सदर मार्गदर्शक सूचना राज्यातील पवन ऊर्जा प्रकल्पांना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाने दिनांक २२.१०.२०१६ रोजी पवन ऊर्जा प्रकल्प विकसित करण्यासाठी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील मुद्दा क्र. ५ येथे नमूद केलेल्या मायक्रोसायटींग विषयक मार्गदर्शक सूचना राज्यातील पवन ऊर्जा प्रकल्पांना जशाच्या तशा लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर मायक्रोसायटींग विषयक मार्गदर्शक सूचना खालीलप्रमाणे आहेत:-

**Micrositing:**

Micrositing is the optimization of energy production through the correct placement of wind turbine generators in the wind farm area, considering all physical constraints of the area. The optimized location of wind turbine generators (WTGs) may be computed by running an appropriate wind flow modelling, optimisation tools (linear and Non-linear) and techniques in any terrain conditions. The criteria for Micrositing shall be based on an optimised output rather than a strict mandated minimum distance between wind turbines. Micrositing criteria are prescribed as under;

i. Developer(s) shall optimise the wind turbine locations within their land using appropriate wind flow modelling and optimisation tools (linear and Non-linear)/techniques subject to site assessment as per IEC 61400-1 standard for turbine safety considering extreme wind, flow inclination, vertical wind shear, and turbulence with added wake effects and corrections for terrain complexity etc.

ii. Developer(s) shall maintain a distance of 2 x D (D-Rotor Diameter) distance perpendicular to the predominant wind direction and 3 x D distance in the pre-dominant wind direction from the boundary line of each adjoining land of other developer(s) with appropriate offset.

iii. Developer(s) shall maintain a wake loss (in terms of energy) of 10 % between wind turbines with appropriate offset for wind turbines sited on a foot print basis.

iv. Developer(s) shall maintain a distance of HH+1/2RD+5m (Hub Height+ Half Rotor Diameter +5 meters) from Public Roads, railway tracks, highways, buildings, public institutions and EHV lines.

v. Developer(s) shall not site wind turbines within 500 m of any dwelling for the mitigation of noise.

The above mentioned Micro siting techniques will also assist in repowering & intercropping as the investors/developers will have no constraints with minimum distances within the available land ensuring optimised utilisation of the land with wind resource.

२. सदर मार्गदर्शक सूचनांची राज्यातील अंमलबजावणीची जबाबदारी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा) कार्यालयाची राहील.

३. सदर मार्गदर्शक सूचना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील. सदर मार्गदर्शक सूचनांमध्ये सुधारणा अथवा बदल करण्याचे अधिकार राज्य शासनास असतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८२५१२४६०११५१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADIP
DATTATRAY
BHINTADE

Digitally signed by PRADIP DATTATRAY BHINTADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=148166d6ba6b6b7506a6c02726418297ae7252d6770d6eeda6fcf82676c59eb5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=70AB5B7C0DEE32FCEE54C2D940368CB9D34A7AEDC3404176B7D9B0082921CFF0, cn=PRADIP DATTATRAY BHINTADE
Date: 2023.08.25 12:48:15 +05'30'

**( प्रदिप भिंताडे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उप मुख्यमंत्री तथा ऊर्जा मंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. सर्व विधानमंडळ सदस्य, विधान भवन, मुंबई,
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई,
११.प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक, उ.ऊ व का.विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
१३.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
१४.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
१५.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
१६.सर्व विभागीय आयुक्त,
१७.महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
१८.सर्व जिल्हाधिकारी,
१९.मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
२०.महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२१.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२२.सचिव, मा.महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
२३.ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.निवड नस्ती, ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.